पोलीस विभागात संगणकीकरणासंबंधी प्रकल्प राबविणेसाठी "प्रकल्प अंमलबजावणी समिती" स्थापन करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

शासन निर्णय क्रमांक पीएलएफ-०४०२/प्र.क्र.४६/पोल-४,

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२, दिनांक १५ जुलै, २००२,

**वाचा :-** सामान्य प्रशासन विभागाचा शासन निर्णय क्र.सीओएम-१००१/प्र.क्र.१७४/०१/३९, दि.२९.१०.२००१.

**प्रस्तावना :-** शासकीय कामकाजाचे संपूर्ण संगणकीकरण करण्यासाठी संदर्भाधीन दि.२९.१०.२००१ च्या शासन निर्णयान्वये शासनाने कार्यपध्दती विहित केलेली आहे. सदर शासन निर्णयाच्या परिच्छेद क्र.७.० अनुसार संगणकीकरणाचे मोठे प्रकल्प राबविण्यासाठी संबंधित प्रशासकीय विभागांनी "प्रकल्प अंमलबजावणी समिती" स्थापन करणे आवश्यक आहे. तसेच समितीमध्ये सचिव (माहिती व तंत्रज्ञान/ सा.प्र.वि.), सचिव (नियोजन विभाग), सचिव (वित्त विभाग) अणि क्षेत्रीय कार्यालयातील जानकार व्यक्ती यांना सदस्य म्हणून घेणे आवश्यक आहे. त्याशिवाय सदर समितीत तज्ञ म्हणून बाहेरील तज्ञ व्यक्तीसही आवश्यकतेप्रमाणे घेता येते.

**शासन निर्णय :-** त्यानुसार पोलीस दलाच्या आधुनिकीकरणाच्या कार्यक्रमांतर्गत केंद्र शासनाकडून संगणकीकरण व त्यांच्याशी संबंधित प्रकल्पांकरिता (क्लोज सर्कीट टी.व्ही., जीआयएस/जीपीएस सिस्टिम, संगणकीकरण इत्यादी) मोठ्या प्रमाणावर निधी मंजूर करण्यात आला असून पोलीस विभागात तसेच न्याय वैज्ञानिक संस्थेतील सदर प्रकल्पांची प्रभाविपणे अंमलबजावणी करण्यासाठी खालीलप्रमाणे **"प्रकल्प अंमलबजावणी समिती"** स्थापन करण्यात येत आहे..

| | | |
|---|---|---|
| १) | अपर मुख्य सचिव (गृह) गृह विभाग, मंत्रालय, मुंबई. | : पदसिध्द अध्यक्ष |
| २) | प्रधान सचिव (विशेष) गृह विभाग, मंत्रालय, मुंबई. | : स्थायी सदस्य |
| ३) | प्रधान सचिव (अ. व सु.), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई. | : स्थायी सदस्य |
| ४) | प्रधान सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई. | : स्थायी सदस्य |
| ५) | प्रधान सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई. | : स्थायी सदस्य |
| ६) | सचिव (माहिती व तंत्रज्ञान), सा.प्र.वि., मंत्रालय, मुंबई | : स्थायी सदस्य |

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई. : स्थायी सदस्य

आयुक्त, राज्य गुप्तवार्ता विभाग, महाराष्ट्र राज्य, मुंबई. : स्थायी सदस्य

पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई. : आमंत्रित सदस्य

(केवळ त्यांच्याशी संबंधीत प्रस्तावाबाबत)

संचालक, न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय, : आमंत्रित सदस्य

महाराष्ट्र राज्य, मुंबई. (केवळ त्यांच्याशी संबंधीत प्रस्तावाबाबत)

महासंचालक, ॲन्टी करप्शन ब्युरो, महाराष्ट्र राज्य, मुंबई. : आमंत्रित सदस्य

(केवळ त्यांच्याशी संबंधीत प्रस्तावाबाबत)

सह सचिव / उप सचिव (पोल-४), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई. : सदस्य सचिव

सदर समिती पोलीस विभागात संगणकीकरण व संगणकीकरणासंबंधीत प्रकल्पांच्या अंमलबजावणीबाबत संदर्भाधीन दि.२९.१०.२००१ च्या शासन निर्णयान्वये विहित करण्यात आलेल्या कार्यपध्दती नुसार कार्यवाही करण्यास जबाबदार राहील. तसेच संबंधित विभागामध्ये संगणकीकरणाचे काम करित असलेल्या व्यक्तिंना तसेच बाहेरील तज्ञ व्यक्तिंना आवश्यकता भासल्यास समितीच्या बैठकीसाठी निमंत्रित म्हणून बोलाविता येईल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(रा. बा. घाडगे)

कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

प्रति,

१) अपर मुख्य सचिव (गृह) गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
२) प्रधान सचिव (विशेष) गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) प्रधान सचिव (अ. व सु.), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) प्रधान सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) प्रधान सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) सचिव (माहिती व तंत्रज्ञान), सा.प्र.वि., मंत्रालय, मुंबई
७) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
८) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
९) आयुक्त, राज्य गुप्तवार्ता विभाग, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१०) संचालक, न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
११) महासंचालक, ॲन्टी करप्शन ब्युरो, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१२) सह सचिव / उप सचिव (पोल-४), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३) निवड नस्ती............